**अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेतंर्गत शैक्षणिक दर्जा ,निवासी सुविधा इ.विषयी पाहणी करण्याबाबत समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०१६/प्र.क्र.२३६/का.१२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : **१९ नोव्हेंबर २०१६.**

**वाचा -**

**१)** आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का-१३, दि.२८.०८.२००९
**२)** आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.११८/का-१२, दि.२१.०४.२०१५
**३)** आदिवासी विकास विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.नानिशा-२०१५/प्र.क्र.११८/का-१२, दि१७.०५.२०१६.
**४)** आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. नानिशा-२०१५/प्र.क्र.३८७/का-१२, दि.२७.०६.२०१६
**५)** आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः नानिशा-२०१६/प्र.क्र.५८/का-१२, दि.०१.०७.२०१६ दि.२५.०७.२०१६, दि.३१.०८.२०१६ ,दि.२५.१०.२०१६ व दि.०९.११.२०१६

**प्रस्तावना:-**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबत संदर्भ क्र. १ येथील दि.२८.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे.प्रस्तुत प्रकरणी संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक २१-४-२०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार योजनेतंर्गत नामांकित शाळांमध्ये दरवर्षी पाठविण्यात येत असलेल्या २५०० विद्यार्थ्यांच्या संख्येत १० पटीने वाढ करुन दरवर्षी २५,००० एवढा लक्षांक ठरविण्यात आला. तसेच संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक १७-५-२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार सदर योजनेंतर्गत इयता १ ली ते ५ वी या सर्व टप्प्यांवर प्रवेश देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.प्रकरणी संदर्भाधिन क्र. ४ येथील दिनांक २७-६-२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार सदर योजनेतंर्गत निवड करावयाच्या नामांकित शाळांमध्ये आवश्यक सोयीसुविधा, व्यवस्थापन व प्रशासन, बौध्दिक बाबी इ. मुद्यांच्या आधारे शुल्क निश्चित करण्यासाठी शाळांचे मुल्यांकन करण्याबाबत निकष निश्चित करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर योजनेतंर्गत निवड होण्याबाबत प्राप्त झालेल्या इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शिक्षण संस्था/शाळांच्या प्रस्तावांची संबंधीत अप्पर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या शिफारशीस अनुसरून सचिव (आदिवासी विकास) यांचे अध्यक्षतेखालील सचिव स्तरीय समितीच्या बैठकीत तपासणी करण्यात येते व अंतिमत: शासन मान्यतेने अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याकरीता नामांकित शाळांची निवड करण्यात येते. अशारीतीने अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षाकरिता इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये शिक्षण देण्याकरिता विहित निकष पुर्ण करीत असलेल्या १३२ शाळांची संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयान्वये निवड करण्यात आलेली आहे,तसेच चालु वर्षी विद्यार्थी न दिलेल्या परंतु यापुर्वी विद्यार्थी दिलेल्या २४ शाळा अशा एकुण १५६ इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळांमध्ये सदर योजनेतंर्गत अनुसुचित जमातीचे विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. अशा नामांकित शाळामध्ये उपलब्ध असणा-या शैक्षणिक व इतर सुविधांच्या आधारे निश्चित होणारे शुल्क संबंधित शाळेस शासनामार्फत अदा करण्यात येत आहे. त्यानुसार सदर शाळेमार्फत देण्यात येणारा शैक्षणिक

दर्जा व अनुसुचित जमातीच्या विद्यार्थ्यांना देण्यात येणारी वागणूक याबाबत पाहणी करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शिक्षणाच्या बदलत्या परिस्थितीनुसार मुख्य प्रवाहात आणण्यासाठी तसेच त्यांना दर्जेदार शिक्षण मिळावे म्हणून सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासुन अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेंतर्गत दरवर्षी २५००० विद्यार्थी निवड करण्याबाबत लक्षांक ठरविण्यात आला आहे.सदर योजनेतंर्गत निवड करण्यात आलेल्या शाळांमध्ये प्रवेशीत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना कशाप्रकारची वागणूक देण्यात येते, त्यांच्या शिक्षणाचा दर्जा, त्यांच्याशी भेदभाव केला जातो किंवा कसे यासाठी या शाळांना प्रत्यक्ष भेटी देऊन पाहणी करण्यासाठी अशा शाळा ज्या महसुली विभागामध्ये कार्यरत असतील त्या महसुली विभागाच्या विभागीय आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**विभागीय आयुक्त (संबंधित महसूली विभाग) - अध्यक्ष**

**संबंधित अप्पर आयुक्त, आदिवासी विकास - सदस्य सचिव**

२) सदर समितीने नामांकित निवासी शाळा योजनेंतर्गत निवड करण्यात आलेल्या त्यांच्या विभागातील काही शाळांना प्रत्यक्ष भेट देऊन अशा शाळांमध्ये प्रवेशीत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना कशाप्रकारची वागणूक देण्यात येते, त्यांच्या शिक्षणाचा दर्जा, त्यांच्याशी भेदभाव केला जातो किंवा कसे, उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या शैक्षणिक व निवासी सोई-सुविधा, इ.बाबत वस्तुनिष्ठ अहवाल शासनास सादर करावा. तसेच याविषयी सुधारणा करण्यासाठी काय उपाययोजना कराव्यात याबाबतही सदर अहवालामध्ये स्पष्टपणे शिफारशी कराव्यात .

३) सदर समितीने वर्षभरामध्ये विषंयाकित नामांकित शाळांना नियमितपणे भेट देऊन आपले अहवाल शासनास सादर करावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११९१५३६२०११२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarrao Aute
Date: 2016.11.19 15:41:24 +05'30'

**( रविंद्र औटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई

३) मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव

४) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.

५) मा. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई

६) अपर मुख्य सचिव, (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.

७) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.

८) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर

९) विभागीय आयुक्त, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती.

१०) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.

११) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/नागपूर/अमरावती/ठाणे.

१२) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

१३) सर्व संबंधित संस्था/शाळा. (संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)

१४) निवड नस्ती का-१२.